**शासनामार्फत वाळू / रेतीचे उत्खनन, साठवणूक व ऑनलाईन प्रणालीद्वारे विक्री धोरणाच्या अनूषंगाने निविदाधारकास निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: गौखनि-१०/१०२३/प्र.क्र.६४/ख-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २७ मार्च, २०२४

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांक : गौखनि-१०/१२२२/प्र.क्र.८२/ख-१, दिनांक १९ एप्रिल, २०२३.
२) शासन निर्णय क्रमांक: गौखनि-१०/१०२३/प्र.क्र.६४/ख-१, दि. २७ फेब्रुवारी, २०२४
३) शासन निर्णय क्रमांक: गौखनि-१०/१०२३/प्र.क्र.६४/ख-१, दि. १४ मार्च, २०२४

प्रस्तावना-

शासनाने वाळू / रेतीचे उत्खनन, साठवणूक व ऑनलाईन प्रणालीद्वारे विक्री बाबत सर्वंकष वाळू धोरण निर्गमित केले आहे. नदी/खाडीपात्रातून वाळूचे उत्खनन, डेपोपर्यंत वाहतूक, डेपो निर्मिती व व्यवस्थापन यासाठी जिल्हाधिकारी यांचेस्तरावर काढण्यात आलेल्या निविदेमध्ये प्राप्त न्युनतम निविदाधारकाने दिनांक १५.०२.२०२४ पर्यंत महाखनिज प्रणालिद्वारे ऑनलाईन वाळू विक्री केलेल्या वाळूच्या प्रमाणात त्यांना नियमातील तरतुदीनुसार निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

दिनांक १९.०४.२०२३ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार वाळू उत्खनन, वाहतूक व डेपो निर्मितीसाठी निविदाधारकाने निविदेमध्ये नमूद केलेला न्युनतम दर विचारात घेऊन निविदाधारकांने उत्खनन करुन वाळू डेपोमध्ये साठा केलेल्या वाळू पैकी विक्री झालेल्या वाळूचे परिमाण विचारात घेऊन खाली नमूद केलेल्या डेपो निर्मितीधारकास/निविदाधारकास वाळू डेपोनिहाय अदा करावयाची रक्कम खालीलप्रमाणे आहे:-

**(रक्कम रुपये)**

| **जिल्हा : धाराशिव** | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **वाळूडेपोचे नाव** | **सदर शासन निर्णयानुसार दिनांक ३१.०१.२०२४ पर्यंत वितरित केलेली रक्कम रक्कम** | **दिनांक १५.०२.२०२४ पर्यंत उत्खनन करुन विक्री केलेल्या वाळूची ९०% देय रक्कम** | **या शासन निर्णयानुसार वितरीत करण्यात येणारी रक्कम** |
| १ | डिकसळ | १०,२४,४७२/- | १२,०४,३०१/- | १,७९,८२९/- |
| | **एकूण** | **१०,२४,४७२/-** | **१२,०४,३०१/-** | **१,७९,८२९/-** |

०२. वरील तकत्यामधील डेपो करीता वितरित करावयाची एकूण रक्कम रुपये १,७९,८२९/- (एक लाख एकोणऐंशी हजार आठशे एकोणतीस रुपये फक्त) खालील अटी व शर्तीस अधीन राहून अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

१) निविदाधारक यांना यापूर्वी सदर रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी.
२) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी खर्च करताना निविदाधारकाने विक्री केलेल्या वाळूच्या परिमाणाच्या ९०% पेक्षा जास्त रक्कम अदा होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.
३) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.

४) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्षगत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

६) या आदेशान्वये वितरीत केलेल्या निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी / विभागीय आयुक्त/शासनारा तातडीने सादर करावे.

७) ज्या जिल्हाधिकारी यांनी उक्त वाळू डेपोसाठी जिल्हा खनिज प्रतिष्ठाण निधीमधून निविदाधारकांना या पूर्वी रक्कम प्रदान केली असेल ती रक्कम जिल्हा खनिज प्रतिष्ठाण मध्ये वर्ग करण्याची सर्वस्वी जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील.

८) सदर ज्ञापनात डेपो निहाय नमूद केलेल्या रक्कमेपेक्षा जास्तीची रक्कम जिल्हा खनिज प्रतिष्ठाण निधीमधून खर्ची टाकल्यास वित्तीय अनियमितता समजून शिस्तभंगाविषयी कारवाई करण्यात येईल याची नोंद आहरंण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

९) जिल्हा खनिज प्रतिष्ठाण निधीमधून डेपो निविदाधारकास शासन मान्यतेशिवाय निधी देण्यात येवू नये.

**०३.** याबाबतचा खर्च, सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात मंजूर अनुदानातून मागणी क्रमांक सी-०१, मुख्य लेखाशीर्ष २८५३ अलोहयुक्त खाणी आणि धातू शात्रीय उद्योग, ०२ खाणींचे नियमन आणि विकास १०२ - खनिज अन्वेषण (००) (०१) ०६- उद्योग आणि धातू ००- उद्योग आणि धातू (०) (दत्तमत) वाळूचे उत्खनन, साठवणूक, वाहतुक इत्यादी खर्चासाठी प्रसिद्ध करण्यात आलेल्या निविदेचा खर्च या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर योजनेचा संगणक सांकेतांक क्र. २८५३०१८८ असा आहे.

**०४.** या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून निधी वितरणासाठी उप सचिव (ख-१), महसूल व वन विभाग हे "नियंत्रक अधिकारी" आणि जिल्हा खनिकर्म अधिकारी हे "आहरण व संवितरण अधिकारी" असतील.

**०५.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३९/२०२४/व्यय-९ दिनांक २५/०१/२०२४ अन्वये दिलेल्या दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२७१७०११४१४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.03.27 17:11:11 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी,धाराशिव**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, धाराशिव
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती